**मंत्रालयीन विभागातील श्रीमती सु.मो.महाडीक,उप सचिव व श्री.वि.द.शिंदे,उप सचिव यांच्या मुदतपूर्व बदलीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः प्रतिनि-२०१६/प्र.क्र.२०६/का.१४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ३१.०१.२०२०

**संदर्भ-** सामान्य प्रशासन विभाग शासन आदेश क्र.उसब-१३१९/प्र.क्र.३०/का.१४, दि.१२.०६.२०१९

## आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ चे कलम ४(४) व ४(५) नुसार **श्रीमती सु.मो.महाडिक, उप सचिव, वित्त विभाग** यांची प्रशासकीय कारणास्तव **सामान्य प्रशासन विभागातील उप सचिवांच्या रिक्त पदावर** बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

२. **श्री.वि.द.शिंदे, उप सचिव**, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांची संदर्भाधिन शासन आदेशान्वये महिला व बाल विकास विभागात बदलीने पदस्थापना करण्यात आली होती. आता प्रशासकीय कारणास्तव श्री.वि.द.शिंदे, उप सचिव, यांची सुधारीत पदस्थापना **श्रीमती सु.मो.महाडिक, उप सचिव यांच्या बदलीमुळे वित्त विभागातील रिक्त होणाऱ्या पदावर** करण्यात येत आहे.

३. श्री.वि.द.शिंदे, उप सचिव यांचा दि. ७.१२.२०१९ (म.पू.) पासून ते आदेशाच्या दिनांकापर्यंतचा सक्तीचा प्रतिक्षाधिन कालावधी मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्याची कार्यवाही म.ना.से. (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ च्या नियम ९ (१४) (एफ) नुसार व वित्त विभाग शासन निर्णय दि.०२.०६.२००३ मधील तरतुदीनुसार वित्त विभागने करावी.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००१३११७५११९४५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.01.31 17:29:44 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) अ.मु.स.(सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई-३२.

३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव ., मंत्रालय, मुंबई

४) अ.मु.स./प्र.स./सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग/ महिला बाल विकास विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

५) सह / उप सचिव (आस्था.), सामान्य प्रशासन विभाग/ पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग/ महिला बाल विकास विभाग/ वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

६) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, ठाकरसी हाऊस, बँलार्ड पिअर, सुरजी वल्लभदास मार्ग, मुंबई-४०० ००१

७) संबंधित अधिकारी

७) आहरण व संवितरण अधिकारी, संबंधित मंत्रालयीन विभाग

८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

९) निवड नस्ती का.१४